# चला, कासव पाळू

लेखक: मिलिसेंट सेल्सम

चित्रे: अरनॉल्ड लोबेल



# चला, कासव पाळू

मराठी अनुवादः सुशील मेन्सन







“कासव पाळीव प्राणी नसतात,” जेरी म्हणाला.

“होय, ते पाळीवच असतात,” बिली म्हणाला.

“नाही, ते पाळीव नसतात,” जेरी म्हणाला. “मला असा प्राणी पाळायचाय जो मी घरी आल्यावर आपलं शेपूट हलवेल.”

“माझी आई मला कुत्रा पाळू देणार नाही,” बिली म्हणाला.

“मग?” जेरी म्हणाला. “माझी आई परवानगी देईल असं वाटतं.”

“बघ, जेरी,” बिलीने विचारले, “आपण दोस्त आहोत ना?”

“हो तर,” जेरी म्हणाला.

“मग,” बिली म्हणाला.

“आपण सारखेच प्राणी आणू. चल कासवच आणू.”

“कासवच का?” जेरीने विचारले.

“कारण ते भुंकत नाहीत,” बिली म्हणाला.

“पण ते आपली शेपूटसुद्धा हलवत नाहीत,” जेरी म्हणाला, “नको कासव.”

बिली विचारात पडला. मग तो म्हणाला, “कासवांना फारशी जागा लागत नाही. आणि ते कुत्र्यांसारखे महागडे नसतात.”

“पण माशांनासुद्धा फारशी जागा लागत नाही. आणि तेसुद्धा महागडे नसतात,” जेरी म्हणाला, “नकोच कासव.”




“पण माझ्याकडे अगोदरच एक गोल्डफीश आहे,” बिली म्हणाला. “चल, पाळीव प्राण्यांच्या दुकानात जाऊ, कासव बघायला.”

“ठीकाय,” जेरी म्हणाला.




बिली आणि जेरी पाळीव प्राण्यांच्या दुकानात गेले. तिथे त्यांना काही कासव दिसले. छोटेसे हिरवे कासव टँकमध्ये एका मोठ्या दगडावर चढत होते, घसरत होते.

"हे कोणते कासव आहेत?" बिलीने विचारले.

"लाल कानाचे कासव," दुकानदार म्हणाला.

"यांच्या डोक्याच्या दोन्ही बाजुंना लाल खूण दिसतेय आहे."

"काय किंमत आहे यांची?" जेरीने विचारले.

"एकाचे पन्नास सेंट," दुकानदार म्हणाला.

बिली म्हणाला, "आम्ही नंतर येतो. आमच्यासाठी काही कासव राखून ठेवा."

मग बिली आणि जेरी घरी आले.

"आपण कासवांना कुठे ठेवायचं?" जेरीने विचारले.

"मी माझ्या जुन्या फिश टँकमध्ये ठेवीन," बिली म्हणाला.

"मला एखादं भांडं विकत घ्यावं लागेल," जेरी म्हणाला.

पुढल्या दिवशी, बिली आणि जेरी पुन्हा दुकानात गेले. बिलीने दोन कासव विकत घेतले. जेरीने दोन कासव आणि त्यांना ठेवायला दोन भांडी विकत घेतली.



मग ते बिलीच्या घरी गेले. बिलीने त्याच्या टँकमधील मासे बाहेर काढले. त्याने टँकमध्ये एक इंच उंचीइतके पाणी भरले. टँकच्या मध्यावर त्याने मोठा दगड ठेवला.

“हा दगड कशासाठी आहे?” त्याच्या आईने विचारले.

“मला वाटतं, कासव याच्यावर चढून सुकवत असावेत स्वतःला,” बिली म्हणाला.

“मग टँकमध्ये पाणी का भरलंस?” आईने विचारले.

“मला माहीत नाही,” बिली म्हणाला. “पण दुकानातल्या टँकमध्येसुद्धा पाणी भरलेलं होतं.”



जेरीने कासवाच्या भांड्यात पाणी भरले आणि त्यात एक दगड ठेवला.

“आता काय करायचं?” बिलीने विचारले. “दुकानदाराला विचारायला हवं होतं.”

“ठीकाय,” जेरी म्हणाला, “चल जाऊ दुकानात.”




बिली आणि जेरी पुन्हा दुकानात गेले.

“आम्ही कासवांची काळजी कशी घ्यायची?” बिलीने विचारले.

“मलाही कासवांबद्दल फारशी माहिती नाही,” दुकानदार म्हणाला. “पण कासवांची माहिती देणारं हे पुस्तक वाचा तुम्ही.”

“काय किंमत पुस्तकाची?” बिलीने विचारले.

“पस्तीस सेंट,” दुकानदार म्हणाला.

“मला द्या एक,” बिली म्हणाला.

“आणि माझ्याकडे कासवाचा खाऊसुद्धा आहे,” दुकानदार म्हणाला.

“त्याचे किती सेंट?” बिलीने विचारले.

“पंचवीस सेंट.”

“मला द्या खाऊचा एक डबा,” बिली म्हणाला.

“मलासुद्धा,” जेरी म्हणाला.

“त्यांना खाऊ घालण्याआधी थोडे दिवस थांबा,” दुकानदार म्हणाला. “त्यांना तुमच्या टँकची सवय होऊ दे अगोदर. आणि दर काही दिवसांनी त्यातलं पाणी नक्की बदला.”

बिली आणि जेरी बिलीच्या घरी गेले.

“मला दे ते पुस्तक,” जेरी म्हणाला.

“ते काय खातात, त्याबद्दल वाच जरा,” बिली म्हणाला.

“बरं वाचतो,” जेरी म्हणाला.

**कासव काय खातात?**

*काही कासव छोटे छोटे प्राणी खातात.*

*काही प्राणी आणि वनस्पती खातात.*

*काही कासव फक्त वनस्पती खातात.*

“लाल कानाचे कासव काय खातात?” बिलीने विचारले.

जेरीने पुस्तकात पाहिले.

“लाल कानाचे, लाल कानाचे....हो मिळालं.”

*लाल कानाचे कासव पाण्याखाली त्यांचे अन्न मिळवतात.*

“म्हणूनच त्यांना टँकमध्ये पाण्यात ठेवतात,” बिली म्हणाला.

जेरी वाचू लागला.

*लाल कानाचे कासव किडे, मांस, कोळंबी, फळे आणि भाज्या खातात.*

“डब्यातल्या खाऊबद्दल काय लिहिलंय, वाच जरा?” बिलीने विचारले.

“त्याचं काहीच लिहिलं नाहीये,” जेरी म्हणाला.

“ठीकाय, डब्यावर *कासवाचा खाऊ* असं लिहिलंय म्हणजे कासव नक्कीच ते खात असणार,” बिली म्हणाला.

“देऊन तर बघू,” जेरी म्हणाला.



बिलीचे वडील घरी आले. बिलीने त्यांना आपले कासव दाखवले.

“बरं,” वडील म्हणाले, “मी लहान असताना माझ्याकडेसुद्धा होते कासव.”

“त्यांची काळजी कशी घ्यायची, हे माहितीय का तुम्हाला?” बिलीने विचारले.

“थोड्याफार गोष्टी माहितीयत मला,” त्याचे वडील म्हणाले.

“यांतले बहुतांशी कासव दक्षिणेकडील उबदार भागांमधून येतात. त्यामुळे टँकमधलं पाणीही उबदार असायला हवं. कासवांचं रक्त सभोवतालच्या पाण्याइतकंच थंड किंवा गरम असतं.”



“जेव्हा मी पाण्यात शिरतो तेव्हा माझं रक्त त्या पाण्याइतकंच थंड होतं का?” बिलीने विचारले.

“करून बघ,” वडील म्हणाले. “आंघोळ करताना करून बघ.”

“मी लगेच आंघोळ करतो,” बिली म्हणाला.

मग वडील दोन थर्मामीटर घेऊन आले.

त्यांनी लांबट थर्मामीटर पाण्यात ठेवला.

“किती थंड आहे पाणी?” त्यांनी बिलीला विचारले.

“गार आहे!” बिली म्हणाला.

“थर्मामीटरवरची लाल रेषा कोणत्या संख्येवर आहे ते बघ,” वडील म्हणाले.

“मला वाटतं 80 वर,” बिली म्हणाला.

“ठीकाय,” वडील म्हणाले.

“पाण्याचं तापमान 80 अंश आहे. आता हे छोटं थर्मामीटर तोंडात धर.”

“मला ताप येतो तेव्हा आई हेच थर्मामीटर ठेवते तोंडात,” बिली म्हणाला.

त्याने थर्मामीटर तोंडात ठेवला.

“तोंड बंद कर,” वडील म्हणाले.

तीन मिनिटांनी बिलीच्या वडिलांनी थर्मामीटर काढून पाहिले.





“थर्मामीटर 98.6 दाखवतंय,” ते म्हणाले.

“हे सामान्य तापमान आहे,” बिली म्हणाला.

“होय,” वडील म्हणाले. “ताप आलेला नसतो तेव्हा आपलं तापमान एवढंच असतं.”

“आणि पाण्याचं तापमान फक्त 80 आहे,” बिली म्हणाला. “म्हणजे मी पाण्यापेक्षा गरम आहे.”

नंतर, बिली आणि त्याचे वडील पुन्हा टँककडे गेले.

बिलीने लांबट थर्मामीटर पाण्यात ठेवले. मग त्याने लाल रेषेकडे पाहिले.

“70,” तो म्हणाला.

“आता मी कासवाचं तापमान बघू शकतो का?”

“त्यासाठी जे थर्मामीटर लागतं, ते आपल्याकडे नाही,” वडील म्हणाले. “खात्रीने सांगतो, कासवांचं तापमानसुद्धा 70 अंश असावं. दिवसा कासवांसाठी पाण्याचं तापमान 75 आणि 85 च्या दरम्यान असलं पाहिजे. आणि रात्री तापमान 65 पेक्षा कमी नसलं पाहिजे.”

“एवढं तापमान कसं ठेवायचं?” बिलीने विचारले.

“लहानपणी मी हे कसं करायचो ते विसरून गेलोय आता,” वडील म्हणाले.

सकाळी बिली टँकजवळ गेला.



बिलीने थर्मामीटर पाहिले.

“65!” तो म्हणाला.

“म्हणजे माझ्या कासवांचं तापमानसुद्धा 65 च असलं पाहिजे.”

दुपारी जेवणानंतर बिलीने पुन्हा थर्मामीटर पाहिले. “70,” तो म्हणाला. “कासव पुरेसे उबदार नाहीत.”

बिली जेरीला भेटायला गेला.

त्याने थर्मामीटरही सोबत नेले.

“तुझे कासव कसे आहेत?” बिलीने विचारले.

“मला ठीक वाटतायत,” जेरी म्हणाला.

जेरीने कासवाचे भांडे खिडकीच्या चौकटीवर ठेवले होते.



सूर्य चमकत होता.

“तुझे कासव किती उबदार आहेत माहितीय का?”

“नाही. तुला माहितीय का?” जेरीने विचारले.

बिलीने खिशातून थर्मामीटर काढले आणि भांड्यातील पाण्यात ठेवले.

“90!” तो म्हणाला. “तुझे कासव तुझ्याएवढेच उबदार आहेत.”

“मी किती उबदार आहे?” जेरीने विचारले.

“तू आजारी नसताना तुझं तापमान नेहमी 98.6 असतं.”

“पण कासवाचं तापमान,” बिली म्हणाला, “हे पाण्याच्या तापमानाइतकंच असतं.”



"माझे कासव सकाळी किती गार होते माहितीय? 65!"

"तुला कसं कळलं?" जेरीने विचारले.

"कारण पाण्याचं तापमान 65 होतं," बिली म्हणाला.

"आणि माझे वडील म्हणतात की कासवाचं तापमान पाण्याएवढंच असतं."

"तू कासवाचं तापमान का नाही घेतलंस?" जेरीने विचारले.

"घेतलं पाहिजे होतं," बिली म्हणाला.

"पण आमच्याकडे तसं थर्मामीटर नाही."

"कासवाचं तापमान कशाला माहीत करून घ्यायचंय तुला?" जेरीने विचारले.

"माझे वडील म्हणतात की हे कासव उबदार जागेतून येतात. त्यांना उबदारच ठेवलं पाहिजे," बिली म्हणाला.

"माझे कासव उबदार आहेत," जेरी म्हणाला. "त्यांचं तापमान आत्ता 90 आहे."



“हे जास्तच गरम आहे,” बिली म्हणाला.

“सूर्यामुळे पाणी जास्त तापत असावं. आज रात्री काय होतंय, ते बघ.”

“ठीकाय,” जेरी म्हणाला.

“तुझा थर्मामीटर इथेच ठेवून जा.”

पुढल्या दिवशी सकाळी, जेरीने थर्मामीटर पाहिला.

“55!” तो किंचाळला.

त्याने बिलीला फोन केला.

“माझे कासव जास्तच गार पडलेयत,” तो म्हणाला.

“कासवांचं भांडं खिडकीपासून दूर ने,” बिली म्हणाला. “खिडकीत दिवसा पाणी जास्त गरम होतं आणि रात्री जास्त गार.”



“ठीकाय, मी भांडं दूर नेऊन ठेवतो,” जेरी म्हणाला. “तुझे कासव पुरेसे उबदार आहेत का?”

“नाही,” बिली म्हणाला.

“पाण्याचं तापमान रात्री कमी होऊन 65 होतं. ते ठीकाय. पण दिवसा ते फक्त 70 पर्यंतच वाढतंय. त्यामुळे पाणी थोडंसं गार असतं. पाण्याचं तापमान 75 आणि 85 दरम्यान पाहिजे.”

“तुला कसं माहीत पाण्याचं तापमान किती पाहिजे ते?” जेरीने विचारले.

“माझ्या वडिलांनी सांगितलं मला,” बिली म्हणाला. “पण त्यांना हे आठवत नाही की एवढं तापमान कसं ठेवायचं ते.”

“चल, परत कालच्या दुकानात जाऊ आणि बघू, तिथे कसं तापमान ठेवतात,” जेरी म्हणाला.

बिली आणि जेरी दुकानात गेले. तिथे कासवाच्या टँकमध्ये थर्मामीटर होता. ते 85 इतके तापमान दाखवत होते.





"टँकच्या वर जळणारा बल्ब हे पाणी उबदार ठेवत असणार," जेरी म्हणाला.

"आपणसुद्धा आपल्या कासवांवर बल्बचा प्रकाश टाकू शकतो."

"मी बघतो करून," बिली म्हणाला.

"मीसुद्धा," जेरी म्हणाला.

त्या दुपारी, बिलीने त्याच्या टँकवर एक दिवा लावला.

मग त्याने पाण्यात थर्मामीटर ठेवला. थोड्या वेळाने त्याने थर्मामीटर पाहिले.

"75, दिवा काम करतोय!" तो म्हणाला.



त्याने जेरीला फोन केला.

“तुझ्या दिव्याने काम केलं का?” त्याने विचारले.

“असं वाटतंय खरं,” जेरी म्हणाला. “पाणी गरम लागतंय. पण तू तुझा थर्मामीटर आण.”

बिली थर्मामीटर घेऊन जेरीच्या घरी गेला. त्याने थर्मामीटर जेरीच्या भांड्यात ठेवला.

“80! दिवे चांगलं काम करतायत,” तो म्हणाला.

“रात्री बंद करू दिवे. पण घरात खूप थंडी असली तर दिवे रात्रभर सुरू ठेवू.”

“चांगली आहे कल्पना!” जेरी म्हणाला.

पुढल्या दिवशी जेरीने बिलीला फोन केला. तो म्हणाला, “आता आपले कासव पुरेसे उबदार राहातायत. आता त्यांना खाऊ घालता येईल काय?”

“होय,” बिली म्हणाला. “मी कासवांना खाऊ द्यायचा प्रयत्न करतो,” जेरी म्हणाला.

“मी कासवांना मासे खाऊ घालायचा प्रयत्न करतो,” बिली म्हणाला.

जेरीने डब्यातून थोडासा कासवाचा खाऊ काढला.

त्याने खाऊ कासवाच्या भांड्यात ठेवला.

पण कासवांनी हालचाल केली नाही.

जेरीने एका कासवाला वर उचलले.

त्याने कासवाला खाऊजवळ ठेवले.




पण कासव खाऊपासून दूर गेले.

मग जेरीने दुसऱ्या कासवाला उचलले. त्याला खाऊजवळ ठेवले.

कासवाने खाऊला तोंड लावले.

पण मग तेसुद्धा दूर गेले.





“आता काय करायचं?” जेरी विचार करू लागला. “मी दिवसभर याच्याजवळ नाही थांबू शकत. कासवांनी खाल्लं की नाही हे मला कसं कळणार? ठीकाय, मी खाऊचे तुकडे मोजीन.”

तिथे सहा तुकडे होते.

जेरी निघून गेला.

तासाभराने तो परतला.

खाऊचे सहा तुकडे तसेच पडले होते.

पुढल्या दिवशीही तिथे सहाच तुकडे होते.

म्हणजे, कासव खाऊ खात नव्हते.

जेरी बिलीच्या घरी गेला. “तुझ्या कासवांनी मासे खाल्ले का?” त्याने विचारले.

“होय,” बिली म्हणाला. “दाखवतो तुला त्यांना खाऊ कसं घालायचं ते.”

तो स्वयंपाकघरात गेला आणि एक पाव आणला. त्याने पाव टेबलाच्या कडेवर ठेवला.

“आता मी एक कासव आहे,” तो म्हणाला. “मी पाण्याखाली जातोय. आता मी पाव माझ्या तोंडात धरतोय. आता मी पावाला एका हाताने धक्का देतोय. आता दुसऱ्या हाताने धक्का देतोय. आता पावाचा एक तुकडा माझ्या तोंडात आहे. मी तो गिळतोय.



आता मी पुन्हा पाव तोंडात धरतोय आणि एका हाताने धक्का देतोय.”

“बस्स!” जेरी किंचाळला. “ऐक जरा माझं. माझ्या कासवांनी काहीच खाल्लेलं नाहीये.”

“त्यांना मासे खायला दे,” बिली म्हणाला.

जेरीने माशाच्या दुकानातून काही मासे आणले.

त्याने माशाचे छोटे छोटे तुकडे केले. त्याने काही तुकडे कासवांच्या भांड्यात ठेवले.

एक कासव पोहत पोहत आले.

त्याने माशाच्या तुकड्याला तोंड लावले. मग ते दूर गेले.

दुसरे कासव आले.

त्याने माशाच्या तुकड्याला तोंड लावले. पण तेसुद्धा दूर गेले.



“आता काय करायचं?” जेरीने आईला विचारले. “हे कासव तर मासेसुद्धा खात नाहीयेत!”

“बरं, ते मासे बाहेर काढ आधी भांड्यातून,” आई म्हणाली. “मासे पाण्यात खूप वेळ ठेवले तर पाण्याला वास येईल. एवढं तरी निश्चित माहितीय मला.”





पुढल्या दिवशी जेरीने कासवांना भरडलेले मांस खाऊ घालायचा प्रयत्न केला. पण त्यांनी तेसुद्धा खाल्ले नाही.

मग त्याने केळ्याचा एक तुकडा त्यांना दिला. कासवांनी तो खाल्ला नाही.

प्रत्येक वेळी न खाल्लेले अन्न जेरी भांड्याबाहेर काढू लागला. कारण त्याला कासवांचे भांडे स्वच्छ राखायचे होते.

शेवटी त्याच्या कासवांनी काहीच खाल्लं नाही. मग जेरी बिलीला भेटायला गेला.

“काय करू बिली?” त्याने विचारले. “माझे कासव तर काहीच खात नाहीत!”

“चल, प्राणीसंग्रहालयात फोन करून विचारू,” बिली म्हणाला. “तिथे खूप कासव असतात. त्यांना माहीत असेल काय करायचं ते.”

बिलीने आईला प्राणीसंग्रहालयात फोन करायला सांगितले.

“प्लीज, मला बोलू द्या,” जेरी म्हणाला. “ठीकाय,” बिलीची आई म्हणाली.

बिलीच्या आईने फोन केला.

“तुमच्याकडे कासवांबद्दल कुणाला माहिती आहे का? त्यांच्याशी मी बोलू शकते का?” ती म्हणाली.

मग आईने फोन जेरीकडे दिला.

“हॅलो,” तो म्हणाला. “माझे कासव खाऊ का खात नाहीत, सांगू शकता का मला?”

मग त्याने उत्तर ऐकले.

जेरीने फोन ठेवताच बिलीने विचारले, “काय म्हणाले ते?”

“तिथला माणूस बोलला की त्यांना जिवंत किडे खायला द्या,” जेरी म्हणाला. “तो म्हणाला की किडे पाळीव प्राण्यांच्या दुकानात मिळतील.”



“तू घरी जा,” बिली म्हणाला. “मी एका मिनिटात पोहोचतो तिथे.” थोड्याच वेळात जेरीच्या घराची बेल वाजली.

बिली आला होता.



"हे घे तुला गिफ्ट," तो म्हणाला.

त्याने एका कागदाच्या कपवरचे झाकण पाढले. आतमध्ये छोटे छोटे लाल रंगाचे किडे होते.

"चल, हे देऊन पाहू कासवांना," बिली म्हणाला.

जेरीने थोडे किडे भांड्यात ठेवले. मग जेरी आणि बिली शांत बसले.

एक कासव चालू लागले. आपली लांब मान त्याने आपल्या कवचातून बाहेर काढली.

मग ते थांबले. त्याने तोंड उघडले आणि झट्कन एक किडा आत घेतला.

मग कासव दुसरीकडे गेले.

त्याने आणखी एक किडा तोंडात टाकला.



बिली आणि जेरीने एकमेकांकडे पाहिले. “कासव खातंय हे! कासव खातंय हे!” जेरी ओरडू लागला. “चला, काळजी मिटली.”

आठवडाभर जेरीने कासवांना किडे खाऊ घातले.

कासवांनी सगळे किडे खाल्ले.

मग जेरी त्यांना खायला इतर खाऊ देऊ लागला.



त्याने कासवांना मासे दिले. ते त्यांनी खाल्ले. त्याने कासवांना मांस दिले. ते त्यांनी खाल्ले.

“माझे कासव आता सगळं काही खातायत!” तो आईला म्हणाला.

“तू प्राणीसंग्रहालयातल्या माणसाचे आभार मानायला हवेस,” आई म्हणाली.

“प्लीज मला फोन लावून दे,” जेरी म्हणाला. आईने लगेच फोन केला.

तिने कासवांची देखभाल करणाऱ्या माणसाला फोनवर बोलावून घेतले.

“हॅलो,” जेरी म्हणाला. “मी जेरी बोलतोय. आठवलं? मी माझ्या कासवांबद्दल तुम्हाला विचारलं होतं फोनवर. तुम्ही त्यांना जिवंत किडे खायला दे, म्हणून सांगितलं होतं मला. कासवांनी ते खाल्ले. आता माझे कासव सगळं काही खातायत.” मग जेरी आईकडे वळला. “प्राणीसंग्रहालयातला माणूस तिकडचे कासव पाहायला ये म्हणतोय.”



“आपण रविवारी जाऊ तिथे,” आई म्हणाली.

“बिलीलापण सोबत नेऊ,” जेरी म्हणाला.



रविवारी, बिली आणि जेरी प्राणीसंग्रहालयात गेले.

त्यांना तिथे कासवांचे घर दिसले. त्यांनी कासवांची देखभाल करणाऱ्या माणसाबद्दल चौकशी केली.

“त्यांना सांगा, जेरी आलाय भेटायला,” जेरी म्हणाला.

एक माणूस बाहेर आला.

“तुमच्यात जेरी कोण?” त्याने विचारले.

“मी जेरी,” जेरी म्हणाला. “आणि हा बिली. त्याच्याकडेसुद्धा कासव आहेत.”




“तुझे कासव आता खायला लागलेयत हे ऐकून आनंद झाला,” तो माणूस म्हणाला.

“तुम्हाला काही विचारायचंय,” जेरी म्हणाला. “कासव डब्यातला खाऊ का खात नाहीत?’

“काही कासव डब्यातला खाऊसुद्धा खातात,” तो माणूस म्हणाला.

“पण डब्यातला खाऊ म्हणजे बऱ्याचदा सुक्या माशा असतात. कासवांना त्यापेक्षा जास्त खाऊ लागतो. आम्ही इथल्या तान्हुल्या कासवांना मासे देतो, लहान लहान तुकडे केलेले आणि भरडलेलं मांससुद्धा देतो. एवढा खाऊ आम्ही त्यांना आठवड्यातून तीनदा खायला घालतो.”

“मी असंच करणार,” बिली म्हणाला.

“मीसुद्धा,” जेरी म्हणाला.



“आणि हो,” तो माणूस म्हणाला, “आम्ही मांसामध्ये हाडांचा चुरा मिसळतो.”

“तो कशासाठी?” जेरीने विचारले.

“त्यामुळे कासवांचे कवच वाढते,” तो माणूस म्हणाला.

“आम्हाला कुठे मिळेल हाडांचा चुरा?” जेरीने विचारले.

“सहज मिळेल कुठेही,” तो माणूस म्हणाला.

“थोडंसं कॉड लिव्हर तेलसुद्धा चांगलं असतं. त्यात जीवनसत्व असतात, माहितीय ना.”

बिली आणि जेरीने एकमेकांकडे पाहिले.

मग तो माणूस म्हणाला, “माझ्यासाठीतरी हे करून बघाच?”

“जेरी, तू तुझ्या कासवांना रात्रीचं जेवण देते वेळी मांसात थोडासा हाडांचा चुरा मिसळ. बिली, तूसुद्धा असंच कर. पण आठवड्यातून एकदा मांसात कॉड लिव्हर तेलाचा एक थेंब नक्की मिसळा.”

बिली आणि जेरी गप्प होते. मग बिली म्हणाला, “हा प्रयोग आहे का?”

“होय,” कासवाची देखभाल करणारा माणूस म्हणाला. “नंतर मला त्याचे परिणाम सांगा, काय?”

एका महिन्याने, जेरीने त्या माणसाला एक पत्र लिहिले.



त्याने लिहिले:

प्रिय कासव पालक,

तुम्ही सांगितल्याप्रमाणे बिली आणि मी प्रयोग करत आहोत. त्याचे आणि माझे कासव अजून एकसारखेच दिसतात. पण नक्की सांगता येणार नाही. प्रयोगाची सुरुवात केली तेव्हा आम्ही त्यांची मापं घ्यायला हवी होती. आम्ही आज त्यांची मापं घेतली. काही आठवड्यांनंतर कळवेनच तुम्हाला.

तुमचा मित्र

जेरी



समाप्त